राज्य योजना सन २०२३-२४

**डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) या योजनेतर्गत निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी- ०८.२३/प्र.क्र.२४३/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- १२ मार्च, २०२४.

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३.
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/सी/योजना/प्र.क्र.२१/२०२३-२४/१३३, दिनांक ३१.०७.२०२३.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/सी/योजना/प्र.क्र.२१/२०२३-२४/१६०, दिनांक ०८.०९.२०२३.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/सी/योजना/प्र.क्र.२१/२०२३-२४/१९३, दिनांक ३१.१०.२०२३.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/सी/योजना/इए/संवव्य/प्र.क्र.५/२०२३-२४/२२४, दिनांक २३.११.२०२३.
६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :-अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४.
७. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:- संकिर्ण-२०२४/प्र.क्र. १०/२४/कोषा. प्रशा.५, दिनांक १४.०२.२०२४.
८. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :-अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०४.०३.२०२४.
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-२२ (६)/यो/प्र.क्र. १९/५४४८/२०२३-२४, दिनांक ०६.०३.२०२४

**प्रस्तावना :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता संदर्भ क्रमांक ८ च्या शासन निर्णयान्वये सुधारीत अंदाज निश्चित करण्यात आला आहे. त्यानुसार डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु. ७६००.०० लक्ष नियतव्यय मंजूर करण्यात आला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १, ६, ७ व ८ चे परिपत्रकान्वये महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२३ ला अनुसरुन सन २०२३-२४ या आर्थिक निधी वितरणाच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्या अनुषंगाने आतापर्यत डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु. ३९००.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आला आहे.

३. संदर्भ क्रमांक २, ३, ४, ५ व ९ च्या पत्रान्वये सन २०२३-२४ करीता डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) या योजनेअंतर्गत शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक ८ चे परिपत्रक विचारात घेता अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक २, ३, ४ व ५ तसेच प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे संदर्भ क्रमांक ९ च्या पत्रान्वये केलेली निधीची मागणी लक्षात घेऊन डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) या लेखाशिर्षांतर्गत **रु. १३७५.००** इतका निधी सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार खालील अटी व शर्तीचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:

I. सदर योजनेवर खर्ची टाकावयाची रक्कम सन २०२३-२४ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२, पर्यावरणीय वनिकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे संरक्षण, (००) (१८) डॉ. श्यामाप्रसाद मुखर्जी जन-वन विकास योजना (२४०६-८७११) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

II. योजनांतर्गत प्रस्तावित कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

III. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

IV. सदरच्या खर्चाच्या अनुषंगाने आवश्यक असलेले लेखे व्यवस्थित/अचूक ठेवण्याबाबत दक्षता घ्यावी.

V. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

VI. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३, क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक-: संकिर्ण-२०२४/प्र.क्र. १०/२४/कोषा. प्रशा.५, दिनांक १४.०२.२०२४ व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०४.०३.२०२४ चे काटेकोर पालन करावे .

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३, क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०५.०२.२०२४, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:- संकिर्ण-२०२४/प्र.क्र. १०/२४/कोषा. प्रशा.५, दिनांक १४.०२.२०२४ व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक ०४.०३.२०२४ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१३१३५०४४७०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2024.03.13 14:00:25 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपुर/पश्चिम, मुंबई.
५. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), चंद्रपूर.
६. वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर
७. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक / पेच व्याघ्र प्रकल्प, नागपूर / सह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर.

८. उपवनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर / पांढरकवडा/वर्धा.
९. उप वनसंरक्षक (वन्यजीव), पुणे.
१०. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
११. फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*******

शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी : ०८.२३/प्र.क्र. २४३/फ-१, दिनांक : १२ मार्च, २०२४ रोजीच्या सोबतचे विवरणपत्र.

**(रु. लाखात)**

| अ.क्र. | तपशिल | प्रस्तावाची रक्कम | आता पर्यत वितरीत | वितरीत रककम |
|---|---|---|---|---|
| १ | उप वनसंरक्षक (वन्यजीव), पुणे १२ गावांकरीता प्रति गाव रु. २५.०० लक्ष प्रमाणे. | ३००.०० | १००.०० | २००.०० |
| २ | उप वनसंरक्षक (प्रादेशिक), पांढरकवडा २२ गावांकरीता प्रति गाव रु. २५.०० लक्ष प्रमाणे. | ५५०.०० | ३२५.०० | २२५.०० |
| ३ | उप वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर ७ गावांकरीता प्रति गाव रु. २५.०० लक्ष प्रमाणे. | १७५.०० | ०.०० | १७५.०० |
| ४ | वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर ३ गावांकरीता प्रति गाव रु. २५.०० लक्ष प्रमाणे. | ७५.०० | ०.०० | ७५.०० |
| ५ | वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर २ गावांकरीता प्रति गाव रु. २५.०० लक्ष प्रमाणे. | ५०.०० | ०.०० | ५०.०० |
| ६ | उप वनसंरक्षक (प्रादेशिक), वर्धा २२ गावांकरीता प्रति गाव रु. २५.०० लक्ष प्रमाणे. | ५५०.०० | ०.०० | ५५०.०० |
| ७ | वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर ४ गावांकरीता प्रति गाव रु. २५.०० लक्ष प्रमाणे. | १००.०० | ०.०० | १००.०० |
| **एकूण** | | **१८००.००** | **४२५.००** | **१३७५.००** |

*****